**पुनर्वसन आस्थापना औरंगाबाद विभाग**
**प्रकल्प विस्थापितांच्या पुनर्वसनाच्या कामासाठी निर्माण करण्यात आलेल्या औरंगाबाद विभागातील मंजूर अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२२ ते दिनांक ३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- ईएसटी-२०२१/प्र.क्र.२८/र-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ११ एप्रिल, २०२२.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक आरपीऐ-२००८/प्र.क्र.४३२/र-१, दि. २८/०१/२०१०.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक आरपीए २००८/प्र.क्र.४३२/र-१, दि.२१/०४/२०१०.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.११/०२/२०१६.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२१/०९/२०१६.
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक ईएसटी- २०२१/प्र.क्र.२८ /र-३, दि.०६ /०९/२०२१.
६) वित्त विभाग शासन निर्णय, क्रमांक:-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दिनांक २२/२/२०२२
७) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग यांचे पत्र जा.क्र.२०२१/पुनर्वसन/लेखा/मुदतवाढ/सीआर- दि.०८/०२/२०२२.

**प्रस्तावना:-**

औरंगाबाद विभागातील प्रकल्पग्रस्तांच्या पुनर्वसनाच्या कामासाठी निर्माण करण्यात आलेल्या ४३ अस्थायी पदांना शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.ईएसटी-२०२१/प्र.क्र.२८/र-३, दिनांक ०६/०९/२०२१ अन्वये दिनांक ०१/०९/२०२१ ते दिनांक २८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ मंजूर करण्यात आली होती.

वित्त विभागाच्या दि.२२/०२/२०२१ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२२ ते दि.३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आलेले आहेत. औरंगाबाद विभागांतर्गत पुनर्वसनाच्या कामासाठी वित्त विभागाच्या दि. २२/०२/२०२२ च्या शासन निर्णयानुसार निश्चित केलेल्या आकृतीबंधानुसार मंजूर असलेल्या एकूण ४३ अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२२ ते दि.३१/०८/२०२२ पर्यंत चालू वर्षासाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद तसेच औरंगाबाद/ बीड/ जालना/ परभणी/ नांदेड/ उस्मानाबाद व लातूर या जिल्हा पुनर्वसन कार्यालयात प्रकल्प विस्थापितांच्या पुनर्वसनाच्या कामासाठी निर्माण करण्यात आलेल्या सोबतच्या विवरणपत्रात नमूद ४३ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२२ ते दिनांक ३१/०८/२०२२ या दिनांकापर्यंत चालू ठेवण्यास पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

१. सर्व पदे संबंधित विभागातील संवर्गातील तात्पुरती वाढ समजण्यात यावीत. या पदधारकांना नियमाप्रमाणे महागाई भत्ता व अन्य भत्ते देय आहेत.

२. विवरणपत्रातील पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त अथवा अतिरिक्त कार्यभाराने चालू रहाणार नाहीत.

३. या ४३ पदांवर सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षात होणा-या खर्चापैकी आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांच्या कार्यालयातील ७ पदांचे वेतन व इतर भत्त्यावरील खर्च हा "मागणी क्रमांक सी-५ मुख्य लेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण (०३) प्रकल्पबाधित व्यक्तींची पुनर्वसाहत, आयुक्त औरंगाबाद (०३) (०६) (२२३५ १९२४) (अनिवार्य) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली टाकावा व त्याच लेखाशीर्षाखाली सन २०२२-२०२३ साठीच्या मंजूर झालेल्या अनुदानातून खर्च करण्यात यावा. तसेच जिल्हाधिकारी कार्यालयांमधील पुनर्वसन आस्थापनेवरील ४३ पदांचे वेतन व इतर भत्त्यांवरील खर्च "मागणी क्रमांक सी-५, मुख्य लेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०४) प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन, आयुक्त औरंगाबाद (०४) (०६) (२२३५ १९८९) (अनिवार्य) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली टाकावा व तो त्याच लेखाशीर्षाखाली सन २०२२-२०२३ साठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदरहू योजनांतर्गत खर्च अंतिमत: गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळाकडे वर्ग करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय, क्रमांक:-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दिनांक २२/०२/२०२२ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४१११७३३२८८८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dhananjay Mahesh Nayak

Digitally signed by Dhananjay Mahesh Nayak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=6b0b3c8a4f4c652713fe2c8b99ad7967bd31987605a3a9e2101334fdc07193a3,
serialNumber=cb5501110714de26ce81e7da03153eb0f69a36c6bdc2940d70cfee5ed94e63bf, cn=Dhananjay Mahesh Nayak
Date: 2022.04.11 17:34:35 +05'30'

**(ध.म.नायक)**
**महाराष्ट्र शासनाचे उप सचिव**

**सोबत:-** विवरणपत्र

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
३. महालेखापाल ( लेखा परिक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर.
४. जिल्हाधिकारी, औरंगाबाद/ बीड/ जालना/ परभणी/ नांदेड/ उस्मानाबाद/ लातूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/ बीड/ जालना/ परभणी/ नांदेड/ उस्मानाबाद/ लातूर.
६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१०/अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. कार्यासन अधिकारी ब-१/र-१/र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. निवड नस्ती, कार्यासन र-३, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

## <u>विवरणपत्र</u>

शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक:- ईएसटी-२०२१/प्र.क्र.२८/र-३, दिनांक ११ एप्रिल, २०२२ अन्वये दिनांक ०१/०३/२०२२ ते दि.३१/०८/२०२२ पर्यंत औरंगाबाद विभागातील अस्थायी पदांना मुदतवाढ दिलेल्या पदांबाबतचे विवरणपत्र.

| **अ.क्र.** | **पदांचा तपशील व वेतनश्रेणी** | **आयुक्त औरंगाबाद विभाग यांचे कार्यालय** | **जिल्हाधिकारी कार्यालय** | | | | | | | **एकूण** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | **औरंगाबाद** | **बीड** | **जालना** | **परभणी** | **नांदेड** | **उस्मानाबाद** | **लातूर** | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १) | उपआयुक्त (पुनर्वसन) (अपर जिल्हाधिकारी श्रेणीतील) S-२५ ७८८००-२०९२०० | ०१ | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | **०१** |
| २) | जिल्हा पुनर्वसन अधिकारी (उपजिल्हाधिकारी श्रेणीतील) S-२० ५६१००-१७७५०० | -- | ०१ | -- | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०६ |
| ३) | पुनर्वसन अधिकारी (तहसीलदार श्रेणीतील) S-२० ५५१००-१७५१०० | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- |
| ४) | उपलेखापाल S-२० ५६१००-१७७५०० | ०१ | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | **०१** |
| ५) | अव्वल कारकून S-१२ ३२०००-१०१६०० | ०१ | ०१ | ०१ | ०१ | -- | ०१ | ०१ | ०१ | **०७** |
| ६) | मंडळ अधिकारी S-१२ ३२०००-१०१६०० | -- | ०१ | ०१ | ०१ | -- | ०१ | ०१ | ०१ | **०६** |
| ७) | तलाठी S-८ २५५००-८११०० | -- | -- | -- | ०१ | -- | ०१ | -- | ०१ | **०३** |
| ८) | लघुटंकलेखक S-६ १९९००-६३२०० | ०१ | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | **०१** |
| ९) | लिपीक टंकलेखक S-६ १९९००-६३२०० | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | **०८** |
| १०) | वाहनचालक S-७ २१७००-६९१०० | ०१ | ०१ | -- | ०१ | -- | -- | -- | -- | **०३** |
| ११) | शिपाई S-४ १७१००-५४००० | ०१ | ०१ | -- | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | **०७** |
| | **एकूण** | **०७** | **०६** | **०३** | **०७** | **०३** | **०६** | **०५** | **०६** | **४३** |

*********************************************